**सार्वजनिक वितरण व्यवस्थेचे संगणकीकरण प्रकल्पांतर्गत तालुका व शिधावाटप कार्यालयामध्ये तांत्रिक मनुष्यबळ उपलब्ध करून देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग**
शासन निर्णय क्रमांक: संकीर्ण-२०२४/प्र.क.१०७/सं.क.
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२
दिनांक :- ११ फेब्रुवारी, २०२५

संदर्भ:-

१) शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन (माहिती व तंत्रज्ञान) विभाग, क्र.मातंसं-२०२२/प्र.क.४७/से-२/३९, दि.२७.०९.२०२२
२) प्रकल्प अंमलबजावणी समितीची दि.१६.०१.२०२५ रोजीची बैठक.

**प्रस्तावना:-**

मा.मुख्यमंत्री यांच्यासोबत दि.३०.१२.२०२४ रोजी बैठक घेण्यात आली असून सदर बैठकीमध्ये विभागाचा १०० दिवसांचा कृति आराखडा मंजूर करण्यात आला आहे. सदर कृति आराखड्यामध्ये राज्यातील नागरीकांना स्मार्ट शिधापत्रिका वितरीत करणे, तसेच सदर स्मार्ट शिधापत्रिका राज्यातील स्थलांतरीत कामगार, ऊसतोड कामगार यांना प्रथमतः उपलब्ध करून देणे, २५ लक्ष नवीन लाभार्थ्यांचे राष्ट्रीय अन्न सुरक्षा योजनेत समावेशन करणे, सदर समावेशन करण्याकरीता लाभार्थ्यांचे e-KYC करणे, मयत व्यक्ती व १०० पेक्षा जास्त वय असलेल्या लाभार्थ्यांची तपासणी करून त्यांची नावे शिधापत्रिकामधून वगळणे, Silent शिधापत्रिकावर प्राधान्याने कार्यवाही करणे इ. बाबींवर प्राधान्याने कार्यवाही करावयाची आहे. त्यानुसार तालुकास्तरीय कार्यालयांमध्ये (पुरवठा शाखा) तांत्रिक मनुष्यबळ उपलब्ध करून देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

राज्यात राबविण्यात येणारा सार्वजनिक वितरण व्यवस्थेचे संगणकीकरण प्रकल्प तसेच विभागाच्या १०० दिवसांच्या कृती आराखडयानुसार शिधापत्रिकाविषयक कामकाज तातडीने करण्याकरीता राज्यातील ४०१ तालुकास्तरीय पुरवठा कार्यालय व शिधावाटप कार्यालयांमध्ये IT Office Assistant या पदाचे तांत्रिक मनुष्यबळ दि.३१ मार्च २०२५ पर्यंत उपलब्ध करून देण्यास व त्याकरीता येणाऱ्या रू. ४.८० कोटी खर्चास प्रकल्प अंमलबजावणी समितीच्या दि.१६.०१.२०२५ रोजीच्या बैठकीत मान्यता देण्यात आली आहे. त्यानुसार तालुकास्तरीय पुरवठा कार्यालय व शिधावाटप कार्यालयांमध्ये IT Office Assistant या पदाचे तांत्रिक मनुष्यबळ दि.३१ मार्च २०२५ पर्यंत उपलब्ध करून देण्यास व त्याकरीता येणाऱ्या रू. ४.८० कोटी खर्चास प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

२. माहिती व तंत्रज्ञान विभागाकडील संदर्भ क्र.०१ मधील तरतूदीनुसार विभागांना तांत्रिक मनुष्यबळाची आवश्यकता असल्यास सदर तांत्रिक मनुष्यबळ माहिती व तंत्रज्ञान महामंडळाकडून घेणे अनिवार्य आहे. त्यानुसार राज्यातील ४०१ तालुकास्तरीय पुरवठा कार्यालय व शिधावाटप कार्यालयांमध्ये IT Office Assistant या पदाचे तांत्रिक मनुष्यबळ माहिती व तंत्रज्ञान महामंडळाकडून उपलब्ध करून देण्यात येईल.

३. उपरोक्त बाबींकरीता होणारा खर्च "मागणी क्र.एम-३,३४५१, सचिवालय आर्थिक सेवा, ०९०, सचिवालय, (००) (०६), सार्वजनिक वितरण व्यवस्थेचे संगणकीकरण (राज्य योजना) (कार्यक्रम), (३४५१A०७३)-१७ संगणक खर्च" या लेखाशिर्षाखाली सन २०२४-२५ मध्ये उपलब्ध तरतूदीमधून करण्यात येईल.

४. सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२५०२१११४५३२७१९०६ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Digitally signed by SANTOSH UMESHRAO GAIKWAD
Date: 2025.02.11 14:54:42 +05'30'

**(संतोष गायकवाड)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत:-**

१) मा. राज्यपाल यांचे सचिव
२) मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
३) मा. उपमुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
४) मा. मंत्री, अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण यांचे खाजगी सचिव
५) मा.राज्यमंत्री, अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण यांचे खाजगी सचिव
६) मा. मुख्य सचिव यांचे उपसचिव
७) प्रधान सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
८) प्रधान सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय,मुंबई
९) वित्तीय सल्लागार व उपसचिव, अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग, जी. टी. हॉस्पिटल संकूल, मुंबई
१०) सर्व जिल्हा पुरवठा अधिकारी / अन्नधान्य वितरण अधिकारी / उपनियंत्रक शिधावाटप
११) महालेखापाल, लेखा व अनुज्ञेयता-१/२, मुंबई/नागपूर
१२) महालेखापाल, लेखापरिक्षा-१/२, मुंबई/नागपूर
१३) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
१४) प्रधान सचिव, अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग यांचे स्वीय सहायक
१५) सर्व उपसचिव/अवर सचिव/ कार्यासन अधिकारी, अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग, मुंबई
१६) संचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
१७) निवडनस्ती (कार्यासन स.क.)